**स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गाची दि.०१.०१.१९८९ ते दि.३१.१२.२०१८ या कालावधीच्या दि.११.१२.२०२० रोजी प्रसिध्द केलेल्या अंतिम ज्येष्ठता सूचीमधील सुधारणा.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन शुध्दीपत्रक क्रमांक :- ज्येष्ठता-२०२४/प्र.क्र.७०/आस्था-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दिनांक :- १८ जून, २०२४.

**वाचा** - शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. ज्येष्ठता-२०२०/प्र.क्र.२४/ आस्था-१, दि.११.१२.२०२०.

**शासन शुध्दीपत्रक :-**

स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गाची दि.०१.०१.१९८९ ते दि.३१.१२.२०१८ या कालावधीची अंतिम ज्येष्ठतासूची दि.११.१२.२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये प्रसिद्ध करण्यात आली आहे.

२. दिनांक ११.१२.२०२० रोजी प्रसिध्द केलेल्या अंतिम ज्येष्ठता यादीमध्ये अभियंत्यांच्या नावामध्ये बदल, नियुक्ती आदेशाच्या दिनांकात बदल, सेवाज्येष्ठतेमध्ये बदल करण्याबाबतचे प्रस्ताव शासनास प्राप्त झालेले आहेत. सदर प्रस्तावातील कागदोपत्री पुराव्यांच्या अनुषंगाने आवश्यक त्या सुधारणा करण्यात येत आहे. शासन परिपत्रक दि. ११.१२.२०२० मध्ये करण्यात आलेल्या सुधारणांचे विवरणपत्र "**परिशिष्ट-छ**" यासोबत जोडण्यात आलेले आहे.

३. सदरचे शासन शुध्दीपत्रक श्री.राहुल साळुंखे व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र. ८४८/२०१८, संकिर्ण अर्ज क्र. ३४४/२०२०, श्री.गोरक्षनाथ आगळे यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र. १०५६/२०१९, संकिर्ण अर्ज क्र. ३२९/२०२०, श्री.अरविंद लोखंडे व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र. ९३५/२०२०, संकिर्ण अर्ज क्र. ५८/२०२१, श्री.राजेंद्र माळी व श्री.अरुण रोडगे यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र. ३६/२०२१, श्री.सचिन आटकेकर व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र. १४०/२०२१ व संकिर्ण अर्ज क्र. ७२/२०२१, श्री.गणेश चव्हाण व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र. १४७/२०२१, श्री.इर्शाद महागमी यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र. १६३/२०२१, श्री. भैय्या रामटेके यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर येथे दाखल

केलेला मूळ अर्ज क्र. ९४०/२०२०, श्रीमती सुजाता एस. भातकुले व श्रीमती वृशाली एस. गारोडे यांनी अनुक्रमे मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर येथे दाखल केलेले मूळ अर्ज क्र. ११४६/२०२१, मूळ अर्ज क्र. ११४७/२०२१, श्री.गणेश केशवराव चाटे व इतर यांनी व श्री.प्रमोद गोपाळ नरसुडे यांनी अनुक्रमे मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेले मूळ अर्ज क्र. ४९२/२०२१ व मूळ अर्ज क्र. ५८७/२०२१, श्री. योगेश अहिरे व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल मुळ अर्ज क्र. ६९९/२०२३ मा.उच्च न्यायालय खंडपीठ नागपूर येथे दाखल रिट पिटीशन स्टॅम्प नं. १७०१/२०२३ तसेच इतर सर्व न्यायप्रविष्ट प्रकरणी न्यायनिर्णयांच्या अधीन राहून प्रसिध्द करण्यात येत आहे.

४. सदरचे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आल असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०६१८१२०२४०८९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सोबत :-** परिशिष्ट “छ”.

SATISH KASHINATH HADPE

Digitally signed by SATISH KASHINATH HADPE
DN: CN = SATISH KASHINATH HADPE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC WORKS DEPARTMENT
Date: 2024.06.18 12:19:13 +05'30'

**( सतिश का. हडपे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण नवी मुंबई/ पुणे/ अमरावती.
२. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड,नवी मुंबई/ रत्नागिरी/ अमरावती/ अकोला/ यवतमाळ/ पुणे.
३. परिशिष्ट “छ”मध्ये नमूद सर्व स्थापत्य अभियांत्रिकी सहायक, द्वारा- संबंधीत अधीक्षक अभियंता,
४. कार्यासन अधिकारी सेवा-३ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. निवडनस्ती.

शासन शुध्दीपत्रक क्र.ज्येष्ठता २०२३ / प्र.क्र. ७० /आस्था-१, दिनांक १८/०६/२०२४ चे सहपत्र.

परिशिष्ट "छ"

शासन परिपत्रक क्र. ज्येष्ठता २०२०/प्र.क्र.२४/ आस्था-१, दि. ११.१२.२०२० रोजी प्रसिध्द केलेल्या स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गाच्या दि. ०१.०१.१९८९ ते दि. ३१.१२.२०१८ या कालावधीच्या अंतिम ज्येष्ठता सूची मधील सुधारणांबाबतचे विवरणपत्र.

| अ.क्र. | श्री./ श्रीमती | कर्मचाऱ्याचे नांव | जन्म दिनांक | जात प्रवर्ग | शैक्षणिक अर्हता | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक संवर्गात ज्या पदावरुन आले त्या पदाचे नांव | निम्न पदावरील नियुक्तीचा दिनांक | आस्थापनेचा प्रकार | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक या संवर्गात समावेशन झाल्याचा दिनांक / सरळसेवेने हजर झाल्याचा दिनांक | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक पदाची अर्हताकारी परीक्षा / विभागीय परीक्षा उत्तीर्ण आहे किवा कसे | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक पदाची आर्हताकारी परीक्षा / विभागीय परीक्षा उत्तीर्ण होण्या पासून सूट मिळाली आहे किंवा कसे | सध्याचे मंडळ कार्यालय | जेष्ठतेचा दिनांक | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ |
| २४७९-अ | श्री | अनिल मधुकर शिंदे | ०३-०२-१९८८ | खुला | बी. ई. (सिव्हील) | सरळसेवा | --- | नियमित | ०३-१०-२०१२ | उत्तीर्ण | --- | कोल्हापूर | ०३-१०-२०१२ | अधीक्षक अभियंता, सा. बां. मं., कोल्हापूर यांनी दि.२४.०५.२०२४ रोजीच्या प्रस्तावान्वये श्री. अनिल मधुकर शिंदे यांच्या ज्येष्ठतेमध्ये सुधारणा करण्याबाबत सादर केलेल्या कागदोपत्री पुराव्यास अनुसरुन श्री. अनिल मधुकर शिंदे यांना त्यांचा नियुक्तीचा दिनांक ०३.१०.२०१२ हा ज्येष्ठता दिनांक म्हणून प्रदान करण्यात येत आहे. यास्तव, दि.११.१२.२०२० रोजी प्रसिध्द केलेल्या अंतिम ज्येष्ठता यादीतील अ.क्र. २४७९ वरील श्री. योगेश भानूदास पाटील यांचे खाली व अ.क्र. २४८० वरील श्रीमती स्नेहल दिनकर पळसकर यांचेवर दि.२४७९-अ येथे श्री. अनिल मधुकर शिंदे यांचे स्थान निश्चित करण्यात येत आहे. तसेच अ.क्र. ३१९१ येथील नोंद रद्द करण्यात येत आहे. |
| २५०३ | श्री | नंदकुमार विठ्ठलराव देशमुख | १५-१२-१९९० | खुला | बी. ई. (सिव्हील) | सरळसेवा | --- | नियमित | ०७-०१-२०१३ | उत्तीर्ण | --- | अकोला | ०७-०१-२०१३ | अधीक्षक अभियंता, सा. बां. मंडळ, अकोला यांनी दि.२४.०५.२०२४ रोजीच्या प्रस्तावान्वये श्री. नंदकुमार विठ्ठलराव देशमख, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक यांचे नाव स्थापत्य अभियांत्रिकी सहायक ज्येष्ठता सुची मध्ये श्री.नंदकिशोर विठ्ठलराव देशमुख असे चुकीचे दर्शविण्यात आले असल्याचे कळविले आहे. यास्तव, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गाच्या ज्येष्ठता सुचीमध्ये अ.क्र. २५०३ वर नमुद नावात श्री.नंदकिशोर विठ्ठलराव देशमुख ऐवजी श्री. नंदकुमार विठ्ठलराव देशमुख अशी दुरुस्ती करण्यात येत आहे. |
| २८२२-अ | श्री | मनिष सुरेशराव जिरापुरे | ०८-०३-१९८२ | इ.मा.व. | बी. ई. (सिव्हील) | सरळसेवा | --- | नियमित | २०-०९-२००८ | उत्तीर्ण | --- | यवतमाळ | ०८-०६-२०१४ | अधीक्षक अभियंता, सा. बां. मंडळ, यवतमाळ यांनी दि.१३.०५.२०२४ रोजीच्या प्रस्तावान्वये श्री. मनिष सुरेशराव जिरापुरे, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक यांच्या ज्येष्ठतेमध्ये सुधारणा करण्याबाबत सादर केलेल्या कागदोपत्री पुराव्यांना अनुसरुन श्री. जिरापुरे यांच्या सेवाज्येष्ठतेमध्ये सुधारणा करण्यात येत आहे. यास्तव, दि.११.१२.२०२० रोजी प्रसिध्द केलेल्या अंतिम ज्येष्ठता यादीतील अ.क्र. २८२२ वरील श्री. संदीप गिरीधर भालेराव यांचे खाली व अ.क्र. २८२३ वरील श्री.संजय बसवराज बागलकोटे यांचेवर दि.२८२२-अ येथे श्री. मनिष सुरेशराव जिरापूरे यांचे स्थान निश्चित करण्यात येत आहे. तसेच अ.क्र. २८२५ येथील नोंद रद्द करण्यात येत आहे. |

शासन शुध्दीपत्रक क्र.ज्येष्ठता २०२३ / प्र.क्र. ७० /आस्था-१, दिनांक १८/०६/२०२४ चे सहपत्र.

परिशिष्ट "छ"

शासन परिपत्रक क्र. ज्येष्ठता २०२०/प्र.क्र.२४/ आस्था-१, दि. ११.१२.२०२० रोजी प्रसिध्द केलेल्या स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गाच्या दि. ०१.०१.१९८९ ते दि. ३१.१२.२०१८ या कालावधीच्या अंतिम ज्येष्ठता सूची मधील सुधारणांबाबतचे विवरणपत्र.

| अ.क्र. | श्री./ श्रीमती | कर्मचाऱ्याचे नांव | जन्म दिनांक | जात प्रवर्ग | शैक्षणिक अर्हता | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक संवर्गात ज्या पदावरुन आले त्या पदाचे नांव | निम्न पदावरील नियुक्तीचा दिनांक | आस्थापनेचा प्रकार | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक या संवर्गात समावेशन झाल्याचा दिनांक / सरळसेवेने हजर झाल्याचा दिनांक | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक पदाची अर्हताकारी परीक्षा / विभागीय परीक्षा उत्तीर्ण आहे किवा कसे | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक पदाची आर्हताकारी परीक्षा / विभागीय परीक्षा उत्तीर्ण होण्या पासून सूट मिळाली आहे किंवा कसे | सध्याचे मंडळ कार्यालय | जेष्ठतेचा दिनांक | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ |
| --- | श्री | धैर्यशील गोपीनाथ वाघमारे | १४-०१-१९८३ | अ.जा. | बांधकाम पर्यवेक्षक | सरळसेवा | --- | नियमित | ०६-०६-२०१३ | --- | --- | --- | --- | मुख्य अभियंता, सा. बां. प्रा. वि, कोकण, मुंबई यांनी दि.१५.०५.२०२४ रोजीच्या प्रस्तावासोबत सादर केलेले कागदोपत्री पुरावे पहाता श्री. धैर्यशील गोपीनाथराव वाघमारे हे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदावर दि.०६.०६.२०१३ रोजी हजर झाले आहेत. श्री. वाघमारे यांनी स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदाची अर्हताकारी/ विभागीय परीक्षा विहित संधीत उत्तीर्ण केलेली नसून ते सन २०१९ मध्ये झालेल्या परीक्षेत उत्तीर्ण झाल्याचे दिसून आले आहे. यास्तव, श्री.वाघमारे यांची ज्येष्ठता दि.०१.०६.२०१९ रोजी निश्चित होत आहे. तथापि, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदाची दि.११.१२.२०२० रोजी प्रसिध्द करण्यात आलेल्या ज्येष्ठता यादीचा कालावधी हा ०१.०१.१९८९ ते ३१.१२.२०१८ असा असल्याने श्री.धैर्यशील गोपीनाथराव वाघमारे यांचे नाव ज्येष्ठता यादीतून वगळण्यात येत असून ज्येष्ठता क्र.२५७९ रद्द करण्यात येत आहे. |